वाघाड मध्यम प्रकल्प ता.दिंडोरी जि.नाशिक या योजनेच्या पुच्छ कालव्यातील धुप थांबविण्याबाबत उपाययोजना करण्याच्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेंबाबत

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१३/(८३४/१३)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई

तारीख: ०९ /०९/२०१४

वाचा

**कार्यकारी संचालक,गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद यांचे कार्यालयीन पत्र क्रमांकगोमपाविम/तां-५/लाक्षेविप्राना/वाघाडमप्र/१०२७१/२०१३दि.११.११.२०१३**

**२) मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचे कार्यालयीन पत्र क्रमांक जा क्र उमप्र /तां.२.२./ १४२०/२०१४ दिनांक ३.३.२०१४**

**प्रस्तावना**

वाघाड मध्यम प्रकल्प ता.दिंडोरी, जि.नाशिक या योजनेचा प्रकल्पीय पाणीसाठा २५०५ दलघफू.असून लागवडी लायक क्षेत्र ९६४२ हे. आहे. सदर धरण सन १९७९ मध्ये पूर्ण झाले असून पुच्छ कालव्याची लांबी ७५० मी. व रुंदी ८१ मी. आहे. सन २००७ च्या पावसाळयातील पुरामुळे पुच्छ कालव्याची मोठया प्रमाणात धुप झाली असून त्यानंतरही धुप होण्याची प्रक्रीया चालू आहे.पुच्छ कालव्यावर साखळी क्र.२२५ मी.येथे वाघाड गावाकडे जाणारा पूल असून त्याखाली साक्र-४२० मी.येथे पुर्वीपासून उंचवटा राहिला असल्याने पूर प्रवाह उजव्या बाजूने प्रवाहीत होवून उजव्या बाजूकडील काही जमिनी वाहून गेल्या आहे.यासाठी तसेच उजव्या बाजूकडील वन जमिनीचा नाश टाळण्यासाठी पुच्छ कालव्यासाठी धुप प्रतिबंधक उपाययोजना करणे गरजेचे आहे.त्यामुळे पुच्छ कालव्याची धुप थांबणार आहे. त्याअनुषंगाने सादर केलेल्या अंदाजपत्रकास विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयाव्दारे विस्तार सुधारणा अंतर्गत वाघाड मध्यम प्रकल्प ता.दिंडोरी जि.नाशिक या योजनेच्या पुच्छ कालव्यातील धुप थांबविण्याबाबत उपाययोजना कामासाठीच्या विशेष दुरुस्ती रु. १६८.८४ लक्ष (कामावरील खर्च रु १५३.४९ लक्ष व रु १५.३५ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१)दरसूची बाहय बाबीचे दर सक्षम स्तरावर मंजूरी घेऊन तांत्रिक मान्यता प्रस्तावात मंजुरी दयावी.

२) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी .

३) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

४) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्ततीबाबत विविध टप्प्यांचे दिनांकासहीत (Mile Stone) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार mile stone साध्य करणे अपेक्षित असून जर

त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

५) यांत्रिकी संघटनेमार्फत करता येण्यासारखी विशेष दुरुस्तीची कामे यांत्रिकी संघटनेकडून करुन घेण्यात यावी तसेच पायलटकटचे काम ही यांत्रिकी संघटनेमार्फत करून घ्यावे.

६) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा यासाठी भाग भांडवली अंशदान(१२)(०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास (४७०२ जे १९४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ५८ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे .

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग- पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार आंतर वित्तीय सल्लागाराच्या सहमतीने हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१८३१३८८३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.09.09 19:23:06 +05'30'

**कि.ल.संखे**
**शासनाचे कक्ष अधिकारी**

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई

५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक,प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. कार्यकारी संचालक गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद,
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता, )यांत्रिकी (जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८उप सचिव, (सिंव्य(, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
.१९अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाक्षेवि,नाशिक
.२०अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ(व्दारे), पुणे-१
२१अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ,५ नाशिक
२३. कार्यकारी अभियंता,पालखेड पाटबंधारे विभाग, नाशिक
२३उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५..सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१३/( ८३४ /१३)/ सिंव्य(कामे) दिनांक ०९ .०९.२०१४ चे प्रपत्र

**परिशीष्ट**

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १) | पुच्छ कालव्यातील धुप थांबविण्याबाबत उपाययोजना कामापित्यार्थ | १५३.४९ |
| २ | अनुषंगिक खर्च | १५.३५ |
| | एकूण | १६८.८४ |

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.09.09 19:23:32 +05'30'

कि.ल.संखे
शासनाचे कक्ष अधिकारी